**"लघु उद्योगांचे प्रगणना-नि-नमुना-सर्वेक्षण" ही केंद्र पुरस्कृत योजना बंद झाल्यामुळे या योजनेवरील अस्थायी पदे व्यपगत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र.अपमु-५९१३/१८८/प्र.क्र.३६/उद्योग-३,**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक १३ ऑगस्ट, २०१५

<u>वाचा</u> : १) शासन निर्णय क्र.आयएसटी-१७७९/(२३२२)/उद्योग-३, दि.२१.०२.१९८१
२) विकास आयुक्त, लघुउद्योग एवं अपर सचिव, उद्योग मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्र.१५(६)/८८- Stat.(Census), दि.१६.११.१९८८ चे पत्र.
३) शासन निर्णय क्र.आयएसटी-२५८९/(५०७६)/३८/उ-३, दि.७.०२.१९९०
४) शासन निर्णय क्र.आयएसटी-१७०२/(७०८१)/उद्योग-३, दि.२१.०१.२००६
५) शासन निर्णय क्र.आयएसटी-२००७/(७९९६)/उद्योग-३, दि. १७.०७.२००७
६) शासन निर्णय क्र.आयएसटी-२००९/प्र.क्र.३२७/उद्योग-३, दि. २४.०४.२००९
७) विकास आयुक्त, सूक्ष्म,लघु व मध्यम उद्योग, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.७(२)/२०१२-S&D (Pt.२)/५८४, दि.१९.०३.२०१३
८) विकास आयुक्त, सूक्ष्म,लघु व मध्यम उद्योग, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.७(२)/२०१२-S&D (Pt.२)/११७०, दि.२०.०६.२०१३
९) शासन निर्णय क्र.बदली-१३१३/प्र.क्र.१२२/उद्योग-३, दि. १२.०२.२०१४
१०) शासन निर्णय क्र.बदली-१३१३/प्र.क्र.१२२/उद्योग-३, दि. २२.०९.२०१४

**<u>प्रस्तावना :</u>**

"लघु उद्योगांचे प्रगणना-नि-नमुना-सर्वेक्षण" ही केंद्र पुरस्कृत योजना उद्योग संचालनालयामार्फत राबविली जात होती. केंद्र शासन या योजनेसाठी १००% निधी उपलब्ध करुन देणार असल्याने या योजनेसाठी, संदर्भ क्र. १ अन्वये वित्त व्यय-१६ ने दि.२१.०१.१९८१ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार स्वतंत्र लेखाशीर्ष मंजूर करण्यात आले. संदर्भ क्र. २ नुसार शासन निर्णय दि.७.०२.१९९० अन्वये या योजनेसाठी १ उप संचालक (अर्थ व सांख्यिकी), १ उद्योग अधिकारी, ३ संशोधन सहाय्यक व ३० उद्योग निरीक्षक असे एकूण ३५ अधिकारी / कर्मचारी नव्याने निर्माण करण्यात आले. वित्त विभागाने (साऊ-१), दि.१.०२.१९९० अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार संदर्भ क्र.३ अन्वये ३४ अधिकारी/कर्मचारी यांची सुधारीत पदे मंजूर करण्यात आली. तद्नंतर उद्योग संचालनालयातील पदांचा आढावा घेण्यात येऊन शासन निर्णय दि.२१.०१.२००६ अन्वये एकूण ११०८ पदांचा सुधारीत आकृतीबंध प्रसिद्ध करण्यात आला. उक्त मानकांच्या आढाव्यामध्ये संशोधन सहायकाच्या ३ पदांऐवजी १ पदास मंजूरी मिळाली असल्याने या योजनेसाठी १ उप संचालक (अर्थ व सांख्यिकी), १ संशोधन सहायक (स्थायी) व ३० उद्योग निरीक्षक अशी ३२ पदे सुधारित करुन या आकृतीबंधात समाविष्ट करण्यात आली. यापैकी १ संशोधन सहायक हे पद संदर्भ क्र.६ अन्वये स्थायी करण्यात आले आहे.

२.  "लघु उद्योगांचे प्रगणना-नि-नमुना-सर्वेक्षण" ह्या केंद्र शासन पुरस्कृत योजनेवरील उपरोक्त पदांना ८ ते ११ या पंचवार्षिक योजनेच्या कालावधीमध्ये दरवर्षी तात्पुरत्या स्वरुपात मुदतवाढ देण्यात येत होती. तथापि, संदर्भ क्र. ७ व ८ अन्वये केंद्र शासनाने सदर योजना बंद करण्यात येत असल्याचे तसेच "या योजनेखाली ११ व्या पंचवार्षिक योजनेंतर्गत मंजूरी देण्यात आलेल्या पदांना सन २०१२-१३ व २०१३-१४ साठी निधी उपलब्ध होणार नसल्याचे" कळविले. केंद्र शासनाकडून सदर योजना बंद करण्यात आल्यामुळे या योजनेसाठी निर्माण करण्यात आलेली पदे व्यपगत झालेली आहेत. सदर पदांवर कार्यरत असलेला कर्मचारीवृंद राज्य शासनाकडून नियुक्त करण्यात आलेला असल्याने सदर कर्मचाऱ्यांची सेवा पुढे चालू रहावी यासाठी त्यांना इतरत्र समतुल्य पदावर सामावून घेण्यात आला आहे. तसेच संदर्भ क्र.९ अन्वये संशोधन सहायक (अर्थ व सांख्यिकी) पदावर कार्यरत असलेल्या श्रीमती स्वाती संदाशी, संशोधन सहायक यांना त्यांच्या मूळ कार्यालयाकडे परत पाठविण्यात आले आहे. केंद्र शासनाने सदर योजना बंद केल्याच्या दिनांकापासून अन्य समतुल्य पदावर सामावून घेण्याबाबतची कार्यवाही होईपर्यंतच्या कालावधीचे संबंधित कर्मचाऱ्यांचे थकित वेतन "विशेष बाब" म्हणून काढण्यास संदर्भ क्र.१० अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

३.  संदर्भ क्र. ५ मध्ये ३२ पदांचे कार्यालयनिहाय वर्गीकरण दर्शविण्यात आले आहे. तसेच संदर्भ क्र. ६ अन्वये उद्योग संचालनालयाच्या आस्थापनेवरील २५४ अस्थायी पदे स्थायी करण्यात आली. त्यामध्ये संशोधन सहायक १ पद स्थायी करण्यात आले. त्यामुळे "लघु उद्योगांचे प्रगणना-नि-नमुना-सर्वेक्षण" या योजनेंतर्गत ३१ अस्थायी पदे राहतात. प्रत्येक कार्यालयांत उपलब्ध अस्थायी पदांच्या अनुषंगाने उपरोक्त विवरणपत्रात उद्धृत केल्यानुसार या योजनेंतर्गत कार्यरत असलेल्या पदांनुसार उर्वरित ३१ पदे व्यपगत करावी लागतील.

## शासन निर्णय :

"लघु उद्योगांचे प्रगणना-नि-नमुना-सर्वेक्षण" ही केंद्र पुरस्कृत योजना, राज्य शासनाच्या अधिपत्याखालील उद्योग संचालनालयाकडून राबविण्यात येत होती. संदर्भ क्र.७ व ८ अन्वये सदर योजना बंद करण्यात आल्याचे केंद्र शासनाकडून कळविण्यात आले आहे. सदर योजना बंद झाल्यामुळे या योजनेंतर्गत कार्यरत असलेली, उद्योग संचालनालयाच्या आस्थापनेवरील ३१ अस्थायी पदे व्यपगत करण्यात येत असून सदर पदांचा पुढीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | उद्योग उपसंचालक (अर्थ व सांख्यिकी) गट-अ | १ |
| २ | उद्योग निरीक्षक (उ.श्रे.) गट-क | ७ |
| ३ | उद्योग निरीक्षक (क.श्रे.) गट-क | २३ |
| | एकूण पदे | ३१ |

२.  शासन निर्णय दि.२१.०१.२००६ अन्वये प्रसिद्ध करण्यात आलेल्या उद्योग संचालनालयाच्या एकूण ११०८ पदांच्या सुधारीत आकृतीबंधामध्ये उपरोक्त पदांचा समावेश असल्याने, या आदेशान्वये व्यपगत करण्यात आलेली उपरोक्त अस्थायी पदे उद्योग संचालनालयाच्या आस्थापनेवरील पदांमधून कमी करण्यात येतील.

३. सदर शासन शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८१३१५३९५४८११० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार वा नावाने,

Vaijnath Bhujangrao Latake

Digitally signed by Vaijnath Bhujangrao Latake
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8502d8fbaa5d3d31358e5bf349fc0853019893b61049b2ad260bccf75c596136, cn=Vaijnath Bhujangrao Latake
Date: 2015.08.13 15:43:26 +05'30'

**(वै.भू. लटके)**
शासनाचे उप सचिव.

**प्रत :**

१. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई
२. महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
३. महालेखापाल-२, महाराष्ट्र राज्य, नागपूर,
४. सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
८. संबंधित जिल्हा उद्योग केंद्र (उद्योग संचालनालयामार्फत),
९. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (उद्योग संचालनालयामार्फत),
१०. निवडनस्ती (उद्योग-३)